महाराष्ट्र कषि विद्यापीठे अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम १९९० यामध्ये करावयाच्या दुरुस्त्यांबाबत गठीत करण्यात येणाऱ्या समितीबाबत..

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मकृप-१०१७/प्र.क्र. २९/७ अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- २५ जुलै, २०१७.**

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र कृषि विद्यापीठे कायदा १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम १९९० यामध्ये करावयाच्या दुरुस्त्याबाबतच्या विषय शासन स्तरावर मागील दोन वर्षापासून विचाराधीन आहे. भारतीय कृषि अनुसंधान, नवी दिल्ली यांनी राज्यातील चारही कृषि विद्यापीठांची मानांकन प्रक्रीया, खाजगी कृषि महाविद्यालयांची वाढलेली संख्या आणि कृषि विद्यापीठातील शिक्षकवर्गाच्या फार मोठया प्रमाणात रिक्त असलेल्या जागांमुळे विद्यापीठांची गुणवत्ता खालावलेली आहे, या कारणासाठी स्थगित ठेवली होती. त्यानंतर दोन वर्षासाठी काही अटींवर भारतीय कृषि अनुसंधान, नवी दिल्ली यांनी राज्यातील कृषि विद्यापीठांना मानांकन दिले आहे. राज्यातील कृषि शिक्षणाची गुणवत्ता, सुधारण्यासाठी त्यांनी अनेक उपाय योजना सुचविल्या आहेत. केंद्र शासनाने कृषि विद्यापीठांसाठी तयार केलेला मॉडेल ॲक्ट राज्यासाठी पारीत करावा ही एक अट घातलेली आहे. महाराष्ट्र राज्यातील कृषि शिक्षणाची सद्याची परिस्थिती, सध्या कायद्यात असलेल्या तरतुदी, मॉडेल ॲक्ट मधील राज्यासाठी कृषि शिक्षणाला आवश्यक तरतुदी या सगळयांचा एकत्रितपणे विचार होऊन राज्याच्या गरजेनुसार सर्वकष तरतुदी असलेला महाराष्ट्र कृषि विद्यापीठे कायदा आणि त्या खालील परिनियम तयार करणे आवश्यक आहे. यासाठी डॉ.व्येकटेश्वरलू, कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे अध्यक्षतेखाली समिती नेमण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र कृषि विद्यापीठे कायदा, १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठे परिनियम, १९९० यामध्ये दुरुस्त्या करण्याकरिता डॉ.व्येंकटेश्वरल्लू, कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे समिती नेमण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | डॉ.वेंकटेश्वरल्लू, कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | **अध्यक्ष** |
| २ | १. डॉ.डी.बी.यादव, विभाग प्रमुख तथा अधिष्ठाता (अर्थशास्त्र), महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, अहमदनगर. | **सदस्य** |
| | २. डॉ.डब्ल्यु.एन.नारखेडे, विभाग प्रमुख तथा अधिष्ठाता (ॲग्रोनॉमी), वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी. | **सदस्य** |
| | ३. डॉ.आर.जी.बुरटे, अधिष्ठाता (कृषि), डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली. | **सदस्य** |
| | ४. डॉ.व्ही.एम.भाले, अधिष्ठाता (कृषि), डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला. | **सदस्य** |

| | | |
|---|---|---|
| ३ | १. डॉ.के.एम. नागरगोजे, महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.<br>२. डॉ.एस.जे. काकडे, संचालक (शिक्षण),महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे. | **सदस्य**<br>**सदस्य** |
| ४ | उपमहासंचालक, कृषि शिक्षण विभाग, भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली | **सदस्य** |
| ५ | सह/उप सचिव (कृषि विद्यापीठे), मंत्रालय, मुंबई | **सदस्य** |

**समितीने करावयाची कामे -**

भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली यांनी कृषि विद्यापीठांकरिता तयार केलेला मॉडेल ॲक्ट व महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ तसेच महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० मधील तरतूदींचा तुलनात्मक अभ्यास करुन विद्यापीठाच्या अधिनियम व परिनियमाच्या तरतुदीमध्ये आवश्यक त्या सुधारणा प्रस्तावित करुन अहवाल शासनास सादर करणे.

**उपरोक्त समितीने त्यांचा अहवाल एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करावा. उपरोक्त समितीमधील अशासकीय सदस्य/अध्यक्ष यांना महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेतर्फे फक्त प्रवास भत्ता अनुज्ञेय राहिल.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२६१३१५२२२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prakash Shankar Shete

Digitally signed by Prakash Shankar Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=af336b9b5cf884e0df83ac0f426fe20d17c54caf7b5d1c87a713842aed4eda25, cn=Prakash Shankar Shete
Date: 2017.07.26 13:20:52 +05'30'

**(प्र.शं. शेटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) उपाध्यक्ष, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
५) महासंचालक ,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,१३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे-४११ ००७
६) प्रधान सचिव(कृषि), यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) डॉ.वेंकटेश्वरलू, कुलगुरु, वसंराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
८) डॉ.डब्ल्यु.एन.नारखेडे, विभाग प्रमुख तथा अधिष्ठाता (ॲग्रोनॉमी), वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
९) डॉ.डी.बी.यादव, विभाग प्रमुख तथा अधिष्ठाता (अर्थशास्त्र) महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, अहमदनगर.

१०) डॉ.आर.जी.बुरटे, अधिष्ठाता (कृषि), डॉ.बाहासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
११) डॉ.व्ही.एम. भाले, अधिष्ठाता (कृषि), डॉ.पंजाबराव देशमुख कृषि, विद्यापीठ, अकोला
१२) डॉ.के.एम.नागरगोजे, महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१३) डॉ.एस.जे.काकडे, संचालक (शिक्षण), , महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१४) उपमहासंचालक, कृषि शिक्षण विभाग, भारतीय कृषि अनुसंधान परिषद, नवी दिल्ली.
१५) सह/उपसचिव (कृषि विद्यापीठे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
१७) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
१८) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ , अकोला.
१९) कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
२०) कृषि व पदुम विभाग (कार्यासन ६-अे/८-अे), मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती